**निधी वितरण सन २०२५-२०२६**
आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना केंद्र पुरस्कृत योजना राज्य हिस्सा (४०%) २२१०जी४९४(TSP)
रु.१३.३१कोटी निधी वितरीत करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र.-प्रजयो-२०२५/प्रक्र१३०/ई-११३८५५०/MJPJAY&AB-PMJAY**

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
दिनांक: १३ जून, २०२५.

**वाचा -**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै, २०२३.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२४
३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. लेखाप्र-२०२४/प्र.क्र.२१७/LB/आरोग्य-६, दि. २० फेब्रुवारी, २०२५
४) आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्र. बीयुडी-२०२५/प्र.क्र.२/कार्यासन-६, दिनांक २१.०४.२०२५

**प्रस्तावना -**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन १ येथील दि. २८.७.२०२३ च्या शासन निर्णयान्वये महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजना दि. ०१.०७.२०२४ पासून राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत हमी तत्वावर(Assurance Mode) राबविण्यात येत आहे. आयुष्मान भारत प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२५-२६ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी ४९४ (TSP), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित रु. ५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर मंजूर निधीमधून राज्य आरोग्य हमी सोसायटीस अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांसाठीचे अंगीकृत रुग्णालयांचे दावे अदा करण्यासाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचेमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांच्या उपचाराचे हमी तत्वावरील दावे अदा करण्यासाठी म्हणजेच उपचाराचा जो खर्च होईल तो राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई यांच्या मार्फत योजनेअंतर्गत अंगीकृत रुग्णालयांना अदा करण्यासाठी, सन २०२५-२६ मध्ये लेखाशिर्ष २२१० जी ४९४ (TSP), ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)याखाली अर्थसंकल्पित ५०.०० कोटी तरतुदीपैकी

रु.१३,३१,७१,८५४/- (अक्षरी रुपये तेरा कोटी एकतीस लक्ष एकाहत्तर हजार आठशे चोपन्न फक्त) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या ८४४३- नागरी ठेवी, १०६ वैयक्तिक लेखा, (००) (०२) आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते यामध्ये, आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांच्या नावे सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरील निधी खालील दिलेल्या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

<u>**मागणी क्रमांक टी-५**</u>

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०३ - ग्रामीण आरोग्य सेवा - विषम चिकित्सा

७९६ - जन जाती क्षेत्र उपयोजना

(०१) - जन जाती क्षेत्र उपयोजना

(०१)(०७) - प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (कार्यक्रम) (राज्य हिस्सा ४०%)

**२२१० जी४९४, ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)**

३. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

१) सदरचा निधी हा आयुष्मान भारत- प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेंतर्गत लाभार्थ्यांच्या आरोग्य संरक्षणापोटी रुग्णालयांच्या दाव्यांची अदायगी करण्याकरिता खर्च करण्यात यावा.

२) सदरचा निधी मंजूर प्रयोजनासाठीचे खर्च किंवा उपयोगिता आणल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र विहीत नमुन्यात आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना सादर करावे.

४. सदरील खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरील निधी हा सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही, याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५. राज्य आरोग्य हमी सोसायटी, वरळी, मुंबई या कार्यालयास निधीचा विनियोग करण्यासाठी "आभासी वैयक्तिक ठेव लेखा (Virtual Personal Deposit Account)" ही व्यवस्था संदर्भ क्र. ०३ येथील दिनांक २०.०२.२०२५ च्या शासन निर्णयान्वये लागू केलेली आहे. आभासी वैयक्तिक ठेव लेखा प्रशासक यांनी वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.११०/२०२३/कोषा प्रशा-५, दिनांक १४.०२.२०२४ व विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील दिनांक २०.०२.२०२५ मधील तरतुदींचे तंतोतंत पालन करावे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी,

आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

६. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून रु.१३,३१,७१,८५४/- (अक्षरी रुपये तेरा कोटी एकतीस लक्ष एकाहत्तर हजार आठशे चोपन्न फक्त) एवढा निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या अंतर्गत नव्याने उघडण्यात आलेल्या आभासी वैयक्तिक ठेव लेखा खाते (Virtual Personal Deposit Account) मध्ये जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ०७.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकातील संबंधित असलेल्या सर्व तरतूदींचे/ अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७.०४.२०२५ नुसार व आदिवासी विकास विभागाच्य शासन परिपत्रक क्रमांक: बीयुडी-२०२५/प्र.क्र.२/कार्यासन-६, दि. २१.०४.२०२५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१३१३४५४८३५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Public Health Department, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2025.06.13 17:01:44 +05'30'

**(नीलम संगवई)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३ प्रती)
९. आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६),मंत्रालय,मुंबई
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती.